**महावितरण कंपनीला महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२१ अंतर्गत पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठी प्रोत्साहन निधी रू. ४.७४ कोटी रोखीने वितरीत करणेबाबत.**
**मागणी क्र. के-६ (मुख्यलेखाशिर्ष २८०१५७०३)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : धोरण-२०२२/प्र.क्र. ११३/ऊर्जा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २६ मार्च, २०२४

<u>वाचा</u>:-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक इएलडी-२०१८/प्र.क्र.४/ऊर्जा-१, दिनांक २१.०२.२०१९.
२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्रमांक मइवाधो-२०२१/ प्र.क्र.२५/तां.क.४, दिनांक २३.०७.२०२१.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक लेखाशि-२०२१/प्र.क्र.६०/ ऊर्जा-१, दिनांक ०९.१२.२०२१.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक धोरण-२०२२/प्र.क्र. ११३/ऊर्जा-५,दिनांक २२.०६.२०२२
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं- २०२३/प्रक्र-४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३
६) महावितरण कंपनीचे पत्र क्र. CMD/MSEDCL/NO १८७२६ दि.२१.०६.२०२३
७) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक धोरण-२०२२/प्र.क्र.११३/ऊर्जा-५,दि. ०३.०७.२०२३
८) महावितरण कंपनीचे पत्र क्र. CMD/MSEDCL/NO ३५९५४, दि.७.१२.२०२३

**<u>प्रस्तावना-</u>**

इलेक्ट्रिक वाहनांसाठी राज्यात चार्जिंगच्या सुविधा पुरविण्याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई (महावितरण) या कंपनीला दिनांक २१ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राज्य नोडल एजन्सी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने दि. २३ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये "महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण, २०२१" जाहीर केले आहे. सदर धोरण हे दिनांक ३१ मार्च, २०२५ पर्यंत राज्यामध्ये राबविण्यास मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयामध्ये मुद्दा क्र.२.४.२ नुसार पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने ऊर्जा विभागामार्फत देण्यात येणार असल्याचे नमुद केले आहे. सदर योजनेअंतर्गत मूळ रु. ७.९० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित असून सुधारीत अंदाजात रु. ५.५३ कोटी निधीची तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी शासन निर्णय दि. ०३ जुलै, २०२३ अन्वये रु. ७९ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानुसार पायाभूत चार्जिंग सुविधांची प्रोत्साहने वितरीत करण्यासाठी महावितरणच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने महावितरण कंपनीला उर्वरित निधी रुपये ४,७४,००,०००/- (अक्षरी रु.चार कोटी चौऱ्याहत्तर लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण २०२१ अंतर्गत पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने देण्याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई (महावितरण) यांना रुपये ४,७४,००,०००/- (अक्षरी रु.चार कोटी चौऱ्याहत्तर लक्ष फक्त)_ इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या; यांच्या नावे अदा करण्यात यावा. आदेशामधील व वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या परिपत्रकामधील विहित केलेल्या निकषांची पुर्तता झाल्यानंतर संबधितांना निधी वितरण करण्याची जबाबदारी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांची राहील, या अटिच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च या विभागाच्या "**मागणी क्र. के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १९९ इतर अशासकीय संस्थाना सहाय्य, (०१) इलेक्ट्रिक वाहन धोरण, (०१)(०१) चार्जिग व्यवस्था निर्मितीसाठी प्रोत्साहन (२८०१५७०३), ३३ अर्थसहाय्य**" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री. कराड, उप सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व डॉ. गौरी पाटील, कार्यासन अधिकारी, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या शासननिर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने देणेबाबतच्या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी. सदर निधी खर्च करण्यापूर्वी संबंधीत प्रकल्पांना सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रत्यक्ष खर्चाच्या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. विहित कालावधीत निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महावितरणकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदार निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यावर टाकण्यात यावी. उक्त नमूद योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करण्यात यावा.

६. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सर्शत असून,वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि.१२/०४/२०२३च्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे

७. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२४०३२६१८४६५८५५१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.03.27 12:45:27 +05'30'

**( ना. श्री. कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा)यांचे सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (ऊर्जा) मंत्रालय, मुंबई-३२.
९. प्रधान सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१०. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

११. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१३. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८. अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९. कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. कार्यासन अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२
२१. कार्यासन अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.